लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडील प्रलंबित प्रकरणे व विशिष्ट कालमर्यादेत कार्यवाही करण्यासाठी पदांच्या आवश्यकतेबाबत शासनास शिफारशी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लाप्रवि-१४२३/प्र.क्र.९०/पोल-२**
दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३०
तारीख: १४ मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, मुंबई येथे श्री. भाऊसाहेब आंधळकर यांनी फौजदारी रिट याचिका क्रमांक ५२२४/२०२१ दाखल केली असून, या याचिकेमध्ये सुनावणीदरम्यान लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडील पदे व प्रकरणांचा विचार करुन प्रत्येक अधिकाऱ्यामार्फत हाताळण्यात येत असलेल्या कार्यभाराचा आढावा घेण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने दिनांक २३/०१/२०२३ रोजी आदेश पारित करुन गृह विभागास निर्देश दिले आहेत.

लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे सद्यःस्थितीत उपलब्ध असलेले मनुष्यबळ, लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे प्रलंबित असलेली व सुरु असलेली प्रकरणे आणि तक्रारींच्या प्रमाणात आवश्यक असलेले मनुष्यबळ यांचा अभ्यास करुन सविस्तर अहवाल शासनास सादर करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडील प्राप्त तक्रारी, कार्यवाहीधीन प्रकरणे, लाचलुचपत प्रकरणांमध्ये विशिष्ट कालावधीमध्ये चौकशी पूर्ण करण्यासंदर्भातील सूचना,

उपलब्ध मनुष्यबळ व आवश्यक मनुष्यबळ याबाबत शासनास अहवाल सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | कार्यालय | समितीमधील पद |
|---|---|---|---|
| १ | अपर पोलीस महासंचालक (२) | लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई | अध्यक्ष |
| २ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी नामनिर्देशित केलेला पोलीस महानिरिक्षक दर्जाचा अधिकारी | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय | सदस्य |
| ३ | अतिरिक्त पोलीस आयुक्त | लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई | सदस्य |
| ४ | सह सचिव (पोल-२) | गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | पोलीस अधीक्षक | लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, पुणे विभाग, पुणे | सदस्य |
| ६ | निमंत्रित सदस्य (आवश्यकतेनुसार) (अध्यक्षांच्या परवानगीने) | -- | सदस्य |
| ७ | अपर पोलीस अधीक्षक (मुख्यालय) | लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई | सदस्य सचिव |

## समितीची कार्यकक्षा :-

१) सदर समिती लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे (मुख्यालय + सर्व विभाग) उपलब्ध असलेल्या मनुष्यबळाचा अभ्यास करेल.

२) सदर समिती लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे (मुख्यालय + सर्व विभाग) प्रलंबित असलेल्या व सद्यःस्थितीत सुरु असलेल्या प्रकरणांची माहिती घेईल.

३) सदर समिती लाचलुचपत प्रतिबंधक विभागासारख्या केंद्राकडील व अन्य राज्यांकडील संस्था (जसे केंद्रीय अन्वेषण ब्युरो (CBI), इतर राज्यांतील लाचलुचपत प्रतिबंधक यंत्रणा) यांच्याकडील उपलब्ध मनुष्यबळ व त्यांच्याकडील कामाचा व्याप यांचा अभ्यास करेल. तसेच अन्य संस्था व राज्यातील लाचलुचपत प्रतिबंधक विभाग

यांच्याकडील मनुष्यबळाचा व उपलब्ध मनुष्यबळानुसार प्रति अधिकारी/ कर्मचारी येत असलेल्या कामकाजाचा तुलनात्मक अभ्यास करेल.

४) राज्यातील लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे सद्यःस्थितीत प्रलंबित असलेली प्रकरणे व चालू प्रकरणे (Ongoing cases) यांचा अभ्यास करुन ही प्रकरणे विशिष्ट कालमर्यादेत तार्किक निर्णयापर्यंत (Logical End) नेणेबाबत उपाययोजना सुचवेल.

५) सध्या राज्यातील वाढलेले लोकसेवकांचे प्रमाण, त्याप्रमाणात लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे वाढलेल्या तक्रारींचे प्रमाण, वाढलेल्या तक्रारींच्या प्रमाणात या तक्रारी निकाली काढण्यासाठी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाला आवश्यक असलेले अतिरिक्त मनुष्यबळ यांचा तुलनात्मक अभ्यास करुन सदर समिती शासनास शिफारस करेल.

## समितीच्या बैठका :-

अध्यक्षांच्या परवानगीने आवश्यकतेनुसार सदर समितीच्या बैठकांचे आयोजन करण्यात येईल.

## समितीच्या शिफारशी :-

सदर समिती खालील मुद्यांवर आधारित शिफारशी शासनास (गृह विभागास) सादर करील.

(१) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडे सद्यःस्थितीत उपलब्ध असलेले मनुष्यबळ प्रलंबित कामकाजाचा निपटारा करण्यासाठी पुरेसे आहे काय.

(२) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडील प्रलंबित प्रकरणे आणि चालू प्रकरणे यांमध्ये सूसुत्रता आणण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

(३) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडील प्रकरणांचा व्याप व उपलब्ध मनुष्यबळ यामध्ये तफावत असल्यास लाचलुचपत प्रतिबंधक विभागास अतिरिक्त मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे काय.

(४) लाचलुचपत प्रतिबंधक विभागास अतिरिक्त मनुष्यबळ उपलब्ध करुन द्यावयाचे असल्यास त्याकरिता नव्याने पदनिर्मिती करणे आवश्यक आहे काय, अथवा

राज्याकडे उपलब्ध असलेल्या एकूण मनुष्यबळामधून लाचलुचपत प्रतिबंधक विभागाला मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे शक्य आहे काय.

(५) नव्याने पदनिर्मिती करुन मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे आवश्यक असल्यास शासनावर आर्थिक भार किती येईल.

(६) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाला अतिरिक्त मनुष्यबळ देणे आवश्यक असल्यास त्याचे संवर्गनिहाय (पदनिहाय) व कार्यालय-निहाय विवरण देण्यात यावे.

(७) याव्यतिरिक्त समितीला आवश्यक वाटेल अशा मुद्यांवर शिफारशी करण्याची समितीला मुभा असेल.

**समितीला अहवाल सादर करण्याची कालमर्यादा :-**

सदर समिती स्थापनेपासून २ महिन्यांच्या कालावधीत आपला स्वयंस्पष्ट अहवाल शिफारशींसह शासनास सादर करेल.

सदर समितीला अहवाल सादर करण्यास २ महिन्यांच्या पुढे कालावधी आवश्यक असल्यास कारण-मिमांसेसह शासनाकडून पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१४१४१२२७४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2023.03.14 14:46:05 +05'30'

**(चेतन निकम)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, गृह, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, सर पोचखानवाला मार्ग, वरळी पोलीस कॅम्प जवळ, वरळी, मुंबई ४०० ०३०.

६. अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय, मुंबई.

७. अतिरिक्त पोलीस आयुक्त, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, सर पोचखानवाला मार्ग, वरळी पोलीस कॅम्प जवळ, वरळी, मुंबई ४०० ०३०.

८. सह सचिव (पोल-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. पोलीस अधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, पुणे विभाग, पुणे.

१०. अपर पोलीस अधीक्षक (मुख्यालय), लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, सर पोचखानवाला मार्ग, वरळी पोलीस कॅम्प जवळ, वरळी, मुंबई.

११. अवर सचिव (पोल-१, पोल १अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. निवडनस्ती, कार्यासन पोल-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.